सोलापूर महानगरपालिकेने पाणी
पुरवठा योजनेसाठी घेतलेल्या
कर्जाच्या परत फेडीबाबत.

# महाराष्ट्र शासन

शासन निर्णय क्रमांक - सोमपा १००४/अनौ.३८/प्रक्र.६९/नवि-२५
नगर विकास विभाग,
मंत्रालय,मुंबई ४०००३२
दिनांक :-१७ जून २००४

वाचा :-१) शा.नि. पा.पु.व स्व.विभाग क्र. बीयुडी २००४/ प्रक्र.१८२-२/ पापु. २० दि. २/१२/२००२

२) शा.नि. पा. पु. व स्व.वि.क्र.बीयुडी-२००४/प्रक्र. १८२-२/पापु.२० दि.४/१२/२००२

३) शा. नि. पा.पु.व स्व. वि.क्र. हुडको २००२/प्रक्र.१८२/पापु-२० दि. ३१/३/२००३

प्रस्तावना :-

सोलापूर महानगरपालिकेने त्यांच्या पाणी पुरवठा योजनेसाठी हुडकोकडून घेतलेल्या रु. ६०.१२ कोटी कर्जाची मोठी थकबाकी झाल्यामुळे सदर कर्जाच्या परतफेडीबाबत मंत्रीमंडळाच्या दि. २५/१०/२००२ च्या बैठकीत वन टाईम सेटलमेंट (ओ.टी.एस) मान्य करण्यात आला होता. त्याअनुषंगाने शासनाच्या पाणी पुरवठा व स्वच्छता विभागाच्या उपरोक्त संदर्भाधीन क्र.१ येथील शासन निर्णयाअन्वये सोलापूर महानगरपालिकेस हुडकोकडील थकीत कर्जाची परतफेड करण्यासाठी रुपये ३९.४० कोटी कर्ज काही अटींवर देण्यात आले आहे. उपरोक्त अ.क्र. ३ येथील शासन निर्णयान्वये हुडकोचे उर्वरीत थकीत मुद्दल रु. ५४.११ कोटीचे रुपांतर कर्ज रोख्यात करण्यास व त्यास शासन हमी काही अटींच्या अधीन राहून दिलेली आहे. परंतु सदर शासन निर्णयातील सुचनांनुसार सोलापूर महानगरपालिकेकडून अपेक्षित असलेली आवश्यक कार्यवाही / अंमलबजावणी महानगरपालिकेकडून होत नसल्याचे शासनाच्या निदर्शनास आले आहे. परिणामी दि. १ जानेवारी,२००४ रोजी सोलापूर महानगरपालिकेची कर्ज रोख्यापोटी रुपये १२.८५ कोटी हुडकोची थकबाकी झाल्याने, शासनाच्या विविध खात्यांना / संस्थाना हुडकोकडून कर्ज मिळण्यास अडचणी निर्माण झाल्याने दिनांक २४/२/२००४ रोजी

मंत्रिमंडळ बैठकीत याप्रकरणी सर्वंकष विचार करुन शासनाने आता पुढील प्रमाणे निर्णय घेतला आहे.

<u>शासन निर्णय</u> :-

(१) शासनाच्या पाणी पुरवठा व स्वच्छता विभागाकडून तूर्त सोलापूर महानगरपालिकेच्यावतीने रु. १२.८५ कोटी रक्कम महाराष्ट्र जीवन प्राधिकरणामार्फत हुडकोकडे कर्ज रोख्यातील पहिल्या हप्त्यापैकी थकीत रक्कम भरण्यासाठी देण्यास मंजुरी देण्यात येत आहे.

(२) उपरोक्त रु. १२.८५ कोटी रक्कम ११.५ टक्के व्याजासह १२ तिमाहित सोलापूर महानगरपालिकेकडून महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाने वसुल करावी व ती प्राप्त होताच महाराष्ट्र जीवन प्राधिकरणांने शासकीय कोषागारात जमा करावी. त्यासाठी सोलापूर महानगरपलिकेने महाराष्ट्र जीवन प्राधिकरणा बरोबर आवश्यक तो करार दिनांक ३०/६/२००४ पूर्वी करावा.

(३) सोलापूर महानगरपालिकेने यापुढे कर्ज रोख्यावरील व्याज व उर्वरित हप्ते भरण्यासाठी सोलापूर महानगरपालिका आयुक्तांनी यासाठी उघडलेल्या अेस्क्रो अकौंट (Escrow A/c)मध्ये एप्रिल २००४ पासून प्रथम वर्षी दरमहा किमान रुपये २ कोटी व त्यानंतर दरमहा किमान रुपये १.८० कोटी जमा करण्यात यावेत.

(४) सोलापूर महानगरपालिकेची पाणी पुरवठा योजना आर्थिकदृष्ट्या स्वयंपूर्ण होण्यासाठी पाणीपट्टीत आवश्यक ती दरवाढ करण्याचा प्रस्ताव महानगरपालिका आयुक्तांनी शासनाच्या पाणी पुरवठा व स्वच्छता विभागास तात्काळ सादर करावा. सदर दरवाढ दिनांक १ नोव्हेंबर २००४ पासून लागू करणे महानगरपालिकेवर बंधनकारक राहील.

(५) मंत्रिमंडळाच्या दि. २५/१०/२००२ रोजी बैठकीतील निर्णयाच्या अनुषंगाने पाणी पुरवठा व स्वच्छता विभागाने वेळोवेळी निर्गमित केलेल्या शासन निर्णयानुसार सोलापूर महानगरपालिकेने अद्याप न केलेली आवश्यक कार्यवाही महानगरपालिकेने तात्काळ पूर्ण करावी.

०२ या शासन निर्णयाच्या अंमलबजावणीसाठी आवश्यक ती कर्तव्य पार पाडण्यासाठी मुंबई प्रातिक महानगरपालिका अधिनियम, १९४९ मधील कलम ४४८ (२) मधील तरतूदीनुसार महानगरपालिका आयुक्त, सोलापूर यांना प्राधिकृत करण्यात येत आहे.

०३ सदर शासन निर्णय पाणी पुरवठा व स्वच्छता विभागाच्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नांवाने

(प्र.मा. माळवदकर)
उप सचिव, महाराष्ट्र शासन

मा.राज्यपाल यांचे सचिव
मा.मुख्यमंत्री यांचे सचिव
महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र -१, मुंबई.
महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र -२, नागपूर
महालेखापाल (लेखा व परीक्षा) महाराष्ट्र -१, मुंबई.
महालेखापाल (लेखा व परीक्षा) महाराष्ट्र -२, नागपूर
प्रधान सचिव , पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग
प्रधान सचिव , वित्त विभाग
सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण , मुंबई-२१
आयुक्त, सोलापूर महानगरपालिका
अधिदान लेखा अधिकारी,मुंबई
निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई
मुख्य लेखा परीक्षक , स्थानिक लेखा, मुंबई
जिल्हा कोषागार अधिकारी, सोलापूर
रिजनल चिफ, हुडको , एम.एम.आर.डी.ए.इमारत, बांद्रा-कुर्ला कॉम्प्लेक्स, मुंबई-४०००५१
कक्ष अधिकारी ( नवि-२२,२३,२४,२६,नवि-२०)
निवड नस्ती नवि-२५